**श्री. छत्रपती शिवाजी विद्यालय, पौंड, ता. मुळशी, जि. पुणे या महाविद्यालयातील व्यवसाय अभ्यासक्रमाचे वर्ग मौजे करमोळी, ता. मुळशी, जि. पुणे येथे नविन बांधकाम केलेल्या इमारतीमध्ये शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसह स्थलांतरीत करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः व्हीओसी-२०१६/प्र.क्र.१९३/व्यशि-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २ मार्च, २०१७

संदर्भ :

१) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ४/व्हिओसी/२२०३/२०१६-१७/८० दिनांक १६/९/२०१६.

प्रस्तावना :-

श्री. छत्रपती शिवाजी विद्यालय, पौंड, ता. मुळशी, जि. पुणे या महाविद्यालयात १. एमआरईडीए (इलेक्ट्रिकल टेक्नॉलॉजी) २. ॲटोमोबाईल इंजिनिअरींग टेक्निशियन व ३. अकाऊंटींग, फायनाशिअल ऑफिस मॅनेजमेंट हे तीन व्यवसाय अभ्यासक्रम सन १९९१ पासून अनुदानित तत्वावर सुरू आहेत.

उक्त प्रकरणी पौड येथे शासनाच्या अनुदानातून बांधलेली इमारत मोडकळीस आलेली असून वापरास योग्य नाही. संस्थेच्या सदर विद्यालयातील माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित विभागाकडील विद्यार्थी संख्येत वाढ झाली असल्यामुळे वर्गखोल्याची तसेच कार्यशाळेची कमतरता सदर ठिकाणी भासत आहे तसेच व्यवसाय अभ्यासक्रम विभागाकरिता नवीन मानकांनुसार जागेची अडचण निर्माण झाल्यामुळे संस्थेच्या मुळच्या शासन मान्यता असलेल्या जागेच्या ठिकाणापासून १.५० कि.मि. अंतराच्या आत संस्थेने स्वत:चे खर्चाने मौजे करमोळी येथे व्यवसाय अभ्यासक्रमासाठी सुसज्ज इमारतीचे बांधकाम केलेले आहे.

तसेच संस्थेकडे तीनही अभ्यासक्रमासाठी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री उपलब्ध असल्याने पौड, ता. मुळशी, जि. पुणे येथून मौजे करमोळी, ता. मुळशी , जि.पुणे येथे उपरोक्त तीन व्यवसाय अभ्यासक्रम स्थलांतरीत करण्याची शिफारस संचालक (व्यशि) यांनी संदर्भाधिन पत्रान्वये केली आहे. यास्तव श्री. छत्रपती शिवाजी विद्यालय, पौड, ता. मुळशी, जि. पुणे या महाविद्यालयातील व्यवसाय अभ्यासक्रमाचे वर्ग मौजे करमोळी, ता. मुळशी, जि. पुणे येथे स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार श्री. छत्रपती शिवाजी विद्यालय, पौड, ता. मुळशी, जि. पुणे या संस्थेतील १. एमआरईडीए (इलेक्ट्रिकल टेक्नॉलॉजी) २. ॲटोमोबाईल इंजिनिअरींग टेक्निशियन व ३. अकाऊंटींग, फायनाशिअल ऑफिस मॅनेजमेंट या तीन व्यवसाय अभ्यासक्रमाचे वर्ग मौजे करमोळी, ता. मुळशी, जि. पुणे येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. संस्था ज्या ठीकाणाहून स्थलांतरीत होणार आहे त्या ठिकाणी विद्यार्थांची शैक्षणिक गैरसोय होणार नाही.
२. स्थलांतरित करावयाच्या संस्थेमधील कोणत्याही कर्मचाऱ्यांस, व्यवस्थापानास कमी करता येणार नाही.
३. संस्था स्थलांतरित ठिकाणी आवश्यक सर्व प्रकारच्या भौतिक सुविधा संस्था व्यवस्थापन उपलब्ध करून देईल.

सदर व्यवसाय अभ्यासक्रम स्थलांतरणामुळे शासनावर कुठल्याही स्वरूपाच्या आर्थिक भाराचा तसेच पदनिर्मितीचा प्रश्न उद्भवत नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०२११४६१८३३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Laxman Dhakane

Digitally signed by Kailas Laxman Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kailas Laxman Dhakane
Date: 2017.03.02 11:47:20 +05'30'

**( कैलास ढाकणे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (कौ.वि.व उ.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.
२) मा. राज्यमंत्री (कौ.वि.व उ.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.
३) मा. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक.
४) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचे स्वीय सहायक.
५) उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, यांचे स्वीय सहायक.
६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई-१
७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे ( संचालनालया मार्फत.)
८) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, पुणे ( संचालनालया मार्फत.)
९) प्राचार्य, श्री. छत्रपती शिवाजी विद्यालय, पौड, ता. मुळशी, जि. पुणे ( संचालनालया मार्फत.)
१०) निवड नस्ती (व्यशि-४)